**स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव अंतर्गत निधीतून कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ मर्यादित, कोल्हापूर येथील पायाभूत सुविधांच्या कामांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क.२९(२)/सां.का.१**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - १५ मार्च, २०२३

**वाचा :**

१. नियोजन विभाग, शासन परिपत्रक, क्रमांक ससमा२०१०/प्र.क्र.४८(भाग-१)/का-१४६१, दिनांक ११.६.२०१८.
२. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय, क्रमांक संकीर्ण-८२२१/प्र.क्र.१७४/सां.का.४, दिनांक २८.९.२०२१.
३. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय, क्रमांक संकीर्ण-८२२१/प्र.क्र. १७४(भाग-१)/ सां.का.४, दिनांक १३.१०.२०२१.
४. वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्रमांक शासाउ-२०२१/प्र.क्र.०९/सा.उ., दिनांक ०१.६.२०२२.
५. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन पत्र क्रमांक संकीर्ण-८२२२/प्र.क्र.४१३/सांका-४, दिनांक १७.०२.२०२३

**प्रस्तावनाः-**

भारतीय स्वातंत्र्याला ७५ वर्षे पूर्ण होत असल्याच्या पार्श्वभूमीवर "स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव" राज्यात साजरा होत आहे. प्रस्तुत प्रकरणी महोत्सव आयोजनासाठी संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये विविध समित्या गठित करण्यात आलेल्या आहेत. त्यास अनुसरुन मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांच्या अध्यक्षतेखाली कोअर समिती गठीत करण्यात आली आहे. या कोअर समितीने आजादी का अमृत महोत्सव अंतर्गत, धोरण समितीने शिफारस केलेल्या कार्यक्रमाच्या आयोजनाची रुपरेषा ठरविणे तसेच निधीच्या नियोजनाबाबत संबंधितांना शिफारस करावयाची आहे. त्यानुसार कोअर समितीच्या दिनांक ०५.१२.२०२२ रोजी झालेल्या बैठकीत संदर्भ क्र.५ च्या पत्रान्वये कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ मर्यादित, कोल्हापूर यांच्याकरीता स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव" अंतर्गत निधीमधून (इतिवृत्तातील अ.क्र. ११ अन्वये) रू. २० कोटी इतका निधी उपलब्ध करून दिला असल्याचे कळविले आहे. सदर निधीमधून "**कोल्हापूर चित्रनगरी येथील २० खोल्यांच्या वसतीगृहाचे सर्व फर्निचरसह बांधकाम करणे**" या कामास कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ मर्यादित, कोल्हापूर यांच्या संचालक मंडळाने मान्यता दिली आहे. याअनुषंगाने सदर कामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय: -**

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सवांतर्गत, कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ मर्यादित, कोल्हापूर यांच्या अधिपत्याखालील चित्रीकरणासाठी **कोल्हापूर चित्रनगरी येथील २० खोल्यांच्या वसतीगृहाचे सर्व फर्निचरसह बांधकाम करणे**" या कामासाठी येणाऱ्या रु.७,९८,००,०००/- (अक्षरी रुपये सात कोटी अठ्ठ्याण्णव लक्ष फक्त) इतक्या खर्चास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहेः-

i) काम सुरू करण्यापूर्वी आवश्यक असलेल्या नकाशास वास्तु विशारदांकडून मंजूरी घेऊनच काम सुरू करावे.
ii) ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतूदींबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजत्रक करूनच काम हाती घ्यावे.
iii) संबंधित सक्षम प्राधिकरणाकडून तांत्रिक मान्यता घेण्यात यावी.

२. सदर बांधकामावरील खर्च “मागणी क्र झेडडी-२, प्रधान लेखाशिर्ष २२०५ कला व संस्कृती, १०२ कला व संस्कृती प्रचालन, (१३) स्वांतत्र्याचा अमृत महोत्सव (१३)(०१) स्वांतत्र्याचा अमृत महोत्सवांतर्गत कार्यक्रम (कार्यक्रम) (२२०५३७३३), ५०, इतर खर्च” या लेखाशिर्षाखाली मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ सोबतच्या परिशिष्ट भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक ०१ परिच्छेद क्र. १३४ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२३०३१४१४११०९९८२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIDYA HEMANT WAGHMARE

Digitally signed by VIDYA HEMANT WAGHMARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=4e214bf8a250420c28c2084d8dd965c0d454568322bd41981d48971712e51795, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F93EFE7B946BF26FF989D6E5E01E1B122B9EB4E3E4E6799CB8E82B2D33D58DFC, cn=VIDYA HEMANT WAGHMARE
Date: 2023.03.16 11:47:58 +05'30'

**( विद्या वाघमारे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री तथा वित्तमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. वित्त विभाग (व्यय-१५/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई
८. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), मुंबई,
९. लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई.
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
११. व्यवस्थापकीय संचालक, कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ, कोल्हापूर.
१२. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
१३. अवर सचिव (अर्थसंकल्प शाखा) पर्यटन व सांस्कृतिक विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. अवर सचिव, रोख शाखा, पर्यटन व सांस्कृतिक विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. अवर सचिव (सांका-४), पर्यटन व सांस्कृतिक विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. निवडनस्ती / कार्यासन सां का -१.